**शैक्षणिक वर्ष २०२५-२६ पासून कायम विनाअनुदानित तत्वावर पदविका औषधनिर्माणशास्त्र अभ्यासक्रमाची नवीन संस्था सुरू करण्यास मान्यता देणेबाबत.**

**(काजी एज्युकेशनल अँण्ड सोशल,वेल्फेअर सोसायटीचे ,इंदिरा गांधी फार्मसी कॉलेज,परभणी)**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**

**शासन निर्णय क्र.E-1163527-HTED-14025/49/2025-MHT-TE-5)**

मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,

हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०००३२.

दिनांक :- १२ जुन, २०२५.

**संदर्भ:-** १) फार्मसी कौन्सिल ऑफ इंडीया, नवी दिल्ली यांचे पत्र दि.२२.०५.२०२५

२) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक १०/ डी.फार्म . / पीसीआय मान्यता/२०२५-२६/२२३, दि.१०/०६/२०२५.

**प्रस्तावना** :-

फार्मसी कौन्सिल ऑफ इंडीया, नवी दिल्ली यांनी शैक्षणिक वर्ष २०२५-२६ पासून राज्यात कायम विनाअनुदानित तत्वावर पदविका औषधनिर्माणशास्त्र अभ्यासक्रमाची नवीन संस्था सुरू करण्यास मान्यता दिलेली आहे. त्यास अनुसरुन संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी संदर्भाधिन पत्रान्वये त्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे.

**शासन निर्णय** :-

फार्मसी कौन्सिल ऑफ इंडीया, नवी दिल्ली यांनी शैक्षणिक वर्ष २०२५-२६ पासून दिलेल्या मान्यतेस अनुसरुन सोबत जोडलेल्या **प्रपत्र-अ** मध्ये नमूद काजी एज्युकेशनल अँण्ड सोशल,वेल्फेअर सोसायटीचे ,इंदिरा गांधी फार्मसी कॉलेज,परभणी या संस्थेला कायम विनाअनुदानित तत्वावर पदविका औषधनिर्माणशास्त्र अभ्यासक्रमाची नवीन संस्था सुरू करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती –**

१. सदर मंजूरी कायम विना अनुदान तत्वावर राहील.

२. प्रस्तुत बाबतीत अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद/ फार्मसी कौन्सिल ऑफ इंडीया, नवी दिल्ली यांनी विहित केलेल्या तसेच दिनांक २१ मे, १९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील.

३. सदर अभ्यासक्रमासाठी संस्थेची प्रवेश क्षमता विवरणपत्रातील त्यांच्या नावासमोर नमूद केल्याप्रमाणे मर्यादित राहील.

४. शासनाने विहित केलेल्या तसेच अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद/ फार्मसी कौन्सिल ऑफ इंडीया, नवी दिल्ली यांनी विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संस्थेस करारनामा करावा लागेल. तसेच संबंधित कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्या संमतीने समाधानकारकरित्या करण्यात येईल.

५. सदर पदविका अभ्यासक्रमांसाठी संबंधित संस्थेने महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाची संलग्नता घेणे आवश्यक आहे.

६. फार्मसी कौन्सिल ऑफ इंडीया, नवी दिल्ली यांच्या मानकाप्रमाणे सर्व सोयी सुविधा पुर्ण करुन देण्यास संस्था पुर्णपणे जबाबदार राहील असे हमीपत्र संबंधित संस्थाप्रमुखांनी संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेकडे सादर करावयाचे आहे. त्यानंतरच सदर संस्थांना अभ्यासक्रम सुरू करण्यासाठी संचालनालयाने संमती द्यावयाची आहे.

७. संबंधित संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेकडे आवश्यक ते प्रक्रिया शुल्क व संचीत ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

८. सदर व्यावसायीक पदविका अभ्यासक्रमाचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमांच्या प्रवेश नियमानुसार /पद्धतीनुसार करण्यात येतील.

९. अभ्यासक्रमांची शुल्क निश्चिती शुल्क नियामक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई/ शासनाने वेळोवेळी निर्देशीत केलेल्या प्राधिकरणामार्फत विहीत करण्यात येईल.

१०. शुल्क नियामक प्राधिकरण/शासनाने वेळोवेळी निर्देशित केलेल्या प्रधिकरणामार्फत विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संबंधित संस्थांनी आकारल्यास त्या संस्थांवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्यूशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

११. संस्थेने अभ्यासक्रम चालविण्यास पूर्णवेळ शिक्षकवृंद व इतर तांत्रिक कर्मचारी शासन नियमाप्रमाणे नियुक्त करावेत. त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते देण्यात यावेत. तसेच शिक्षकवृंद व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व

भत्ते इत्यादीबाबत तसेच विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

१२. संस्थेतील ग्रंथालयास आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद/फार्मसी कौन्सिल ऑफ इंडिया यांचे मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा. प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

१३. सदर संस्था, संचालक, तंत्रशिक्षण यांच्या नियंत्रणाखाली राहिल व संबंधित अभ्यासक्रमांच्या परीक्षा महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, वांद्रे, मुंबई यांच्याकडून घेतल्या जातील.

१४. रॅगिंग संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक राहील.

१५. याशिवाय संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

१६. ज्या संस्थांनी संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्याकडे शासनाने विहीत केलेले नोंदणी शुल्क अदा केलेले नाही, त्या संस्थांकडून संचालकांनी अंतीम मान्यता देण्यापूर्वी ते वसूल करावे. या शासन मान्यतेनुसार नवीन अभ्यासक्रमांचा समावेश शैक्षणिक वर्ष २०२५-२६ च्या प्रवेश प्रक्रियेत करण्याची कार्यवाही संचालक, तंत्रशिक्षण यांनी त्वरीत करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०६१२१८०६३२२४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJAY VITTHAL KHARDE

Digitally signed by AJAY VITTHAL KHARDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=99f2d58601919f488f4e4b4238bd3f1def13cbf3ed7d870c3ce707f566424ec3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C51AE2EF70E8CB85FD2CAD9AA28A46DC972A1A9B3FEB81BAAB9A648B45BE1B24, cn=AJAY VITTHAL KHARDE
Date: 2025.06.12 18:08:22 +05'30'

**(अजय वि.खर्डे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (उच्च व तंत्रशिक्षण विभाग) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.

२. मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्रशिक्षण विभाग) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.

३. अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीय सहायक , मंत्रालय,मुंबई.

४. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई .

५. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई.,

६. संबंधित सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय., (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)

७. संबंधित संस्था., (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)

८. अतिरिक्त सचिव (तांत्रिक), भारत सरकार, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, ७ वा मजला, चंद्रलोक भवन, जनपथ, नवी दिल्ली - ११० ००१.,

९. फार्मसी कौन्सिल ऑफ इंडिया, कम्बाइन्ड काऊन्सिल्स बिल्डिंग, कोटला रोड, एजवान-इ-गालिब मार्ग, नवी दिल्ली-११० ००२.,

१०. सहायक शिक्षण सल्लागार (तांत्रिक), भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्रालय (शिक्षण भाग), नवी दिल्ली.,

११. विभागीय अधिकारी, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल रिसर्च बिल्डींग,नँशनल इन्स्टिटयुट ऑफ इंडस्ट्रियल इंजिनिअरिंग (एनआयटीआयई) कँम्पस,विहार लेक पवई, मुंबई - ४०० ०८७,

१२. निवड नस्ती/तांशि-५.

उच्च व तंत्रशिक्षण विभाग,शासन निर्णय क्र. **E- 1163527-HTED-14025/49/2025-MHT-TE-5)** सोबतचे

प्रपत्र–अ

कायम विनाअनुदानित तत्वावर पदविका औषधनिर्माणशास्त्र अभ्यासक्रमाची नवीन संस्था सुरू करणे.

| Sr. No. | DTE Code | PCI Code | Institute Name and Address | Affiliating Board/ University | Program Name | Intake Approved by PCI A.Y. 2024-25 | Intake Approved by PCI A.Y. 2025-26 |
|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | NEW | PCI-10423 | Indira Gandhi Pharmacy College, Parbhani 431401 | Maharashtra State Board of Technical Education, Bandra, Mumbai | D.Pharmacy | 0 | 60 |

AJAY VITTHAL KHARDE

Digitally signed by AJAY VITTHAL KHARDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=99f2d58601919f488f4e4b4238bd3f1def13cbf3ed7d870c3ce707f566424ec3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C51AE2EF70E8CB85FD2CAD9AA28A46DC972A1A9B3FEB81BAAB9A648B45BE1B24, cn=AJAY VITTHAL KHARDE
Date: 2025.06.12 18:08:47 +05'30'

(अजय वि.खर्डे)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन